**मुंबई नागरी परिवहन प्रकल्प टपा-३ (MUTP-३) अंतर्गत बाधित प्रकल्पग्रस्तांचे पुनर्वसन मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एमआरडी-३३१७/प्र.क्र.१५/नवि-७,**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २० ऑगस्ट, २०१८.

**प्रस्तावना :**

मुंबई रेल्वे विकास महामंडळामार्फत मुंबई नागरी परिवहन प्रकल्प टप्पा-३ (एमयुटीपी-३) अंतर्गत रु.१०९४७ कोटी अंदाजित खर्चाच्या कामांना केंद्र शासनाच्या मंत्रीमंडळाने मान्यता दिली आहे. सदर प्रकल्पास केंद्रशासनाने दिनांक २० डिसेंबर, २०१६ च्या पत्रान्वये सविस्तर मान्यता दिली आहे. सदर प्रकल्पात विरार-डहाणू दरम्यान रेल्वे मार्गाचे चौपदरीकरण करणे (तिसरी-चौथी रेल्वे मार्गिका टाकणे), कर्जत-पनवेल दरम्यान नवीन उपनगरीय रेल्वे सेवेकरिता मार्गिका टाकणे (रेल्वे मार्गाचे दुपदरीकरण करणे), ऐरोली-कळवा दरम्यान उन्नत रेल्वे मार्ग बांधणे, नवीन रेल्वे गाड्या खरेदी करणे, मध्य व पश्चिम रेल्वे मार्गाच्या मध्य विभागात ट्रेस पास कंट्रोल (रुळ पार करता येऊ नयेत म्हणून संरक्षक भिंत बांधणे) तसेच तांत्रिक सहाय्य अशा कामांचा समावेश आहे.

एमयुटीपी-३ प्रकल्प भारतीय रेल्वेच्या सहभागाने मुंबई रेल्वे विकास महामंडळामार्फत मुंबई नागरी परिवहन प्रकल्प टप्पा-१ व टप्पा- २ च्या धर्तीवर रेल्वे मंत्रालय व महाराष्ट्र शासन यांच्या ५०:५० टक्के आर्थिक सहभाग तत्त्वावर राबविण्यास, सदर प्रकल्प खर्चातील राज्यशासनाच्या ५०% आर्थिक सहभागास तसेच, राज्य शासनाच्या ५०% आर्थिक सहभागाची रक्कम एमएमआरडीए व सिडको यांनी सोसण्याबाबत त्यांना निदेश देण्यास मंत्रिमंडळाने दिनांक १५ डिसेंबर, २०१६ रोजीच्या बैठकीत मान्यता दिली आहे.

मुंबई रेल्वे विकास महामंडळामार्फत राबविण्याचे प्रस्तावित असलेल्या मुंबई नागरी परिवहन प्रकल्प टप्पा-३ (एमयुटीपी-३) अंतर्गत प्रस्तावित रु. १०९४८ कोटी अंदाजित खर्चाच्या रेल्वे प्रकल्पास व या प्रकल्पातील राज्य शासनाच्या आर्थिक सहभागास त्यानुसार शासनाने क्रमांक एमआरडी-३३१३/प्र.क्र.१३०/नवि-७, दि. ७ जानेवारी २०१७ च्या शासन निर्णयान्वये मान्यता दिली आहे. केंद्र व राज्य शासनाच्या नागरी तसेच ग्रामीण भागातील सार्वजनिक निकडीच्या प्रकल्पांकरिता अतिक्रमित शासकिय जमिन उपलब्ध होण्यासाठी या जमिनीवरील अतिक्रमणधारकांना जागा आणि बांधकामापोटी एकमुस्त मोबदल्याची रक्कम

रोख स्वरुपात अदा करण्याच्या दृष्टीने सर्वंकष धोरण निश्चित करण्याबाबत मा. मंत्रिमंडळाने दिनांक १६.०५.२०१८ रोजी मान्यता दिली असून त्यानुषंगाने शासन निर्णय क्रमांक चंमपा-२०१७/प्र.क्र.२३/नवि-२६, दिनांक १३ जून, २०१८ रोजी निर्गमित केला आहे. या पार्श्वभूमीवर एमयुटीपी-३ प्रकल्पाने बाधित होणाऱ्या प्रकल्पग्रस्तांचे पुनर्वसन करण्याच्या अनुषंगाने शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे:-

**शासन निर्णय :**

(१) केंद्र व राज्य शासनाच्या नागरी भागातील निकडीच्या प्रकल्पांकरिता आवश्यक असलेल्या शासकिय जमिनीवरील अतिक्रमणधारकास त्याने केलेल्या बांधकामापोटी मोबदल्याची रक्कम एकमुस्त अदा करुन अशा प्रकल्पासाठी जमिन ताब्यात घेण्याबाबतच्या शासन निर्णय क्रमांक चंमपा-२०१७/ प्र.क्र.२३/ नवि-२६, दिनांक १३ जून, २०१८ अन्वये महानगरपालिका क्षेत्रासाठी अनुज्ञेय केलेल्या बाबी एमयुटीपी टप्पा-३ प्रकल्पाच्या संपुर्ण क्षेत्रासाठी अनुज्ञेय करुन सदर प्रकल्पाने बाधितांचे पुनर्वसन करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

(२) तसेच एमयुटीपी-३ प्रकल्पग्रस्तांच्या पुनर्वसनासाठी शासन निर्णय क्रमांक चंमपा-२०१७/प्र.क्र.२३/नवि-२६, दिनांक १३ जून, २०१८ मधील परिच्छेद 'अ' मधील महानगरपालिका क्षेत्रासाठी नमूद केलेल्या अटी व शर्ती तसेच सर्वसाधारण अटी लागू करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे (सोबत शासन निर्णयाची प्रत परिशिष्ठ-१ म्हणून जोडली आहे).

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८०८१६१४४१२५५७२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shriram Dattatray Yadav

Digitally signed by Shriram Dattatray Yadav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9da0e03bd84c1e17d78ad320814d003150fbf7d2abd36f924e5705145bf0e270, cn=Shriram Dattatray Yadav
Date: 2018.08.20 17:21:29 +05'30'

**( श्रीराम यादव )**
उप सचिव, महाराष्ट्र राज्य

**प्रति,**

१) मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, यांचे सचिव.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

३) मा.राज्यमंत्री (नवि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
४) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
५) प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
६) प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
७) सचिव (विशेष प्रकल्प), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
८) सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
९) महानगरआयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, वांद्रे-कुर्ला संकुल, वांद्रे (पूर्व), मुंबई.
१०) आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई.
११) उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकिय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई.
१२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे.
१३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड, अलिबाग.
१४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पालघर.
१५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे.
१६) आयुक्त, ठाणे महानगरपालिका, ठाणे.
१७) आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका, कोकणभवन, नवी मुंबई.
१८) आयुक्त, भिवंडी-निजामपूर महानगरपालिका, भिवंडी.
१९) आयुक्त, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका, कल्याण.
२०) आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका,
२१) आयुक्त, वसई-विरार महानगरपालिका,
२२) आयुक्त, पनवेल महानगरपालिका, पनवेल.
२३) आयुक्त, उल्हासनगर महानगरपालिका, उल्हासनगर, जि. ठाणे.
२४) मुख्याधिकारी, अंबरनाथ नगरपालिका, अंबरनाथ, जि. ठाणे.
२५) मुख्याधिकारी, कुळगांव-बदलापूर नगरपालिका, कुळगांव बदलापूर, जि. ठाणे.
२६) मुख्याधिकारी, माथेरान नगरपरिषद, माथेरान, जि. रायगड
२७) मुख्याधिकारी, कर्जत नगरपरिषद, कर्जत, जि. रायगड
२८) मुख्याधिकारी, खोपोली नगरपरिषद खोपोली, जि. रायगड
२९) मुख्याधिकारी, पेण नगरपरिषद, पेण, जि. रायगड
३०) मुख्याधिकारी, उरण नगरपरिषद, उरण, जि. रायगड
३१) निवडनस्ती (नवि-७).

परशिष्ठ- **1**

**केंद्र व राज्य शासनाच्या नागरी भागातील निकडीच्या प्रकल्पांकरिता आवश्यक असलेल्या शासकीय जमीनीवरील अतिक्रमणधारकास त्याने केलेल्या बांधकामापोटी मोबदल्याची रक्कम एकमुस्त अदा करुन, अशा प्रकल्पासाठी जमीन ताब्यात घेणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- चंमपा-२०१७/प्र.क्र.२३/नवि-२६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १३ जून, २०१८

वाचा :- शासन निर्णय, नगरविकास विभाग क्र.चंमपा-२०१७/(११४२/२०१६)/प्र.क्र.२३/नवि-२६ दिनांक ०४ सप्टेंबर, २०१७

**प्रस्तावना :**

केंद्र किंवा राज्य शासनाच्या निकडीच्या प्रकल्पासाठी आवश्यक असलेल्या शासकीय जमीनीवर असलेली अतिक्रमणे निष्काषित करुन सदर जागा संबंधित प्रकल्पासाठी सध्याच्या वेगवेगळ्या तरतुदीनुसार अविलंब उपलब्ध होत नाही. अशा निकडीच्या प्रकल्पांसाठी अतिक्रमण असलेली शासकीय जमीन अविलंब उपलब्ध व्हावी व असे प्रकल्प कालमर्यादेत पूर्ण होऊन, प्रकल्पाचा खर्च मर्यादित रहावा म्हणून उपाययोजना करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. त्यासाठी मा.मुख्यमंत्री महोदय यांच्या निदेशानुसार प्रधान सचिव (महसूल) यांच्या अध्यक्षतेखाली उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णयान्वये चार सदस्यीय समिती गठीत करण्यात आलेली होती. तद्नुसार या समितीने सविस्तर अहवाल तयार करुन शासनास सादर केला होता.

प्रधान सचिव (महसूल) यांच्या अध्यक्षतेखालील या समितीने सादर केलेल्या अहवालातील शिफारशींना कांही सुधारणासह मा.मंत्रीमंडळाच्या दिनांक १६/०५/२०१८ च्या बैठकीत मान्यता प्राप्त झालेली आहे. त्यानुसार अशा प्रकरणी कार्यवाही करण्यासंदर्भात नागरी भागासाठी मार्गदर्शक सूचना, निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

केंद्र व राज्य शासनाच्या निकडीच्या प्रकल्पांकरिता नागरी भागात आवश्यक असलेल्या शासकीय जमीनीवर अतिक्रमण असल्यास आणि असे अतिक्रमणधारक शासनाने वेळावेळी निश्चीत केलेल्या निकषानुसार संरक्षणास पात्र असल्यास, त्यांना निष्कासित करताना, अनुसरावयाच्या कार्यपध्दतीबाबत खालीलप्रमाणे मार्गदर्शक सूचना देण्यात येत आहेत, त्यानुसार संबंधीत यंत्रणांनी आवश्यक कार्यवाही करावी.:-

**अ) महानगरपालिका क्षेत्र :-**

- शासकीय जमीनीवरील रहिवाशी अतिक्रमणे अन्यथा नियमित करण्यास पात्र असतील तर अशा अतिक्रमणदारांना महानगरपालिका क्षेत्रात २६९ चौ.फू. क्षेत्रफळाची सदनिका मोफत देण्यात यावी.
- मोफत सदनिका देण्यासाठी उपलब्ध नसल्यास, प्रचलित वार्षिक दर विवरणपत्रातील मुल्यानुसार अशा सदनिकेची किंमत रोख स्वरुपात अशा पात्र अतिक्रमण धारकास देण्यात यावी.
- असे अतिक्रमणधारक अन्यथा त्यांचे अतिक्रमण नियमानुकूल करण्यास पात्र नसतील तर ते मोबदल्यास पात्र नसतील.
- याव्यतिरिक्त, ज्या महानगरपालिका क्षेत्रात युएलसी अंतर्गत सदनिका उपलब्ध असतील, तर अशा सदनिकांचाही यासाठी विचार व्हावा.

**ब) नगरपालिका / नगरपंचायत क्षेत्र :-**

- शासकीय जमीनीवरील रहिवाशी अतिक्रमणे अन्यथा नियमित करण्यास पात्र असतील तर अशा अतिक्रमणदारांना नगरपालिका / नगरपंचायत हद्दीमध्ये अथवा हद्दीपासून पाच किलो मीटर परिसरात ३०० चौ.फू. क्षेत्रफळाची सदनिका मोफत देण्यात यावी.
- मोफत सदनिका देण्यासाठी उपलब्ध नसल्यास, प्रचलित वार्षिक दर विवरणपत्रातील मुल्यानुसार अशा सदनिकेची किंमत रोख स्वरुपात अशा पात्र अतिक्रमण धारकास देण्यात यावी.
- असे अतिक्रणधारक अन्यथा त्यांचे अतिक्रमण नियमानुकूल करण्यास पात्र नसतील तर त्यांना कोणताही मोबदला देण्यात येवू नये.

- **सर्वसाधारण अटी :-**

  १) निकडीच्या शासकीय प्रकल्पांसाठी आवश्यक असलेल्या शासकीय जमीनीवरील अतिक्रमणदार अशा प्रकल्पामुळे बाधित होत असल्यासच, त्याला या धोरणाप्रमाणे विहीत मोबदला देण्यात यावा.

  २) अशा अतिक्रमणदारांना पर्यायी भूखंड/पर्यायी सदनिका/बांधकाम खर्च देताना त्याची ही सर्व माहिती "आधार" क्रमांकासोबत जोडण्यात यावी.

  ३) ज्या ठिकाणी अशा अतिक्रमणदारांना पर्यायी सदनिका द्यावयाच्या आहेत किंवा त्याऐवजी एकरकमी रोख मोबदला द्यावयाचा आहे, अशा प्रकरणात पर्यायी सदनिकेचा किंवा त्या ऐवजी द्यावयाच्या रोख मोबदल्याचा खर्च संबंधीत प्रकल्प ज्या यंत्रणेचा आहे त्या यंत्रणेने सहन करावा.

  ४) पर्यायी सदनिका / भूखंड, बांधकाम खर्च किंवा रोख मोबदला प्रत्येक कुटुंबाला स्वतंत्ररित्या देण्यात यावा.

  ५) दिनांक ०१/०१/२०१८ रोजी किंवा त्यापूर्वी स्वतंत्र शिधापत्रिका असलेले कुटुंब या प्रयोजनार्थ स्वतंत्र कुटुंब समजण्यात यावे.

६) एका झोपडीत एकापेक्षा अधिक कुटुंब रहात असतील व दिनांक ०१/०१/२०१८ रोजी किंवा त्यापूर्वी त्यांची शिधापत्रिका स्वतंत्र असेल तर असे प्रत्येक कुटुंब सदनिका / भूखंड / बांधकाम खर्च किंवा रोख मोबदल्यास पात्र समजण्यात यावे.

७) संबंधीत स्थानिक स्वराज्य संस्थेने, बाधीत पात्र अतिक्रमण धारकांना प्रधानमंत्री आवास योजनेतून घर देण्याच्या संदर्भात प्राधान्याने विचार करावा.

८) सदर धोरण फक्त केंद्र व राज्य शासनाच्या निकडीच्या प्रकल्पांसाठी मर्यादित असेल.

९) संबंधीत प्रकल्प यंत्रणनेने, यासंबंधात जिल्हाधिकारी यांच्या मान्यतेने कार्यवाही करावी.

१०) सदर धोरणाची अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संबंधीत प्रशासकीय विभागाची असेल.

०२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६१३१७३००५४८२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay S Gokhale

Digitally signed by Sanjay S Gokhale
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Urban Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ab8a7eeedad158d24cf530f0d6b6628 08245be49a8459ed4c63961ebdc3cb961, cn=Sanjay S Gokhale
Date: 2018.06.13 17:33:20 +05'30'

**( सं.श.गोखले )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
२) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,सर्व मंत्रालयीन विभाग
३) सर्व विभागीय आयुक्त / सर्व जिल्हाधिकारी,
४) सर्व आयुक्त, महानगरपालिका
५) सर्व मुख्याधिकारी, नगरपालिका/ नगरपंचायती
६) निवडनस्ती, कार्यासन नवि-२६.